कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) यांच्या बदल्या व नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
# जलसंपदा विभाग
## शासन आदेश क्रमांकः एलटीएस-१११४/(५३/२०१४)/आ (वर्ग-१)

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, नवीन मंत्रालय,
लोकमान्य ठिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

**तारीख: १३ ऑगस्ट, २०१४**

**वाचा:-** जलसंपदा विभाग, शासन आदेश क्र.एलटीएस-१११४/(५५३/२०१४)/आ.(वर्ग-१)..(१), दि.२३.०६.२०१४

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीने नियुक्त्या खाली दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकायाचे नाव (सर्वश्री ) | सध्या धारण करीत असलेले पद | बदलीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | पुं.मै.थोटवे | उप अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नाशिक. | कार्यकारी अभियंता, झडपद्वार निर्मिती विभाग, पुणे. | बदली अधिनियमातील कलम ४(४) व ४(५) नुसार संदर्भाधीन आदेशातील अ.क्र.१ मध्ये अंशत: बदलाने श्री.नि.दि.पोटे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी. (विनंतीनुसार) |
| २. | नि.दि.पोटे | कार्यकारी अभियंता, झडपद्वार निर्मिती विभाग, पुणे. | उप अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नाशिक. | बदली अधिनियमातील कलम ४(४) नुसार रिक्त पदी. (विनंतीनुसार) |

२. संबंधित वरिष्ठ अधिका-यांना कळविण्यात येते की, बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना आपल्या नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. असे करताना, त्या अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीचे पद अन्य अधिकाऱ्यांच्या बदलीने रिक्त होत असलेस पदग्रहण अवधी व ते पद रिक्त होणारा दिनांक यानुसार त्यांना कार्यमुक्त करावे.

३. संबंधीत अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरित कळवावे.

४. संबंधीत अधिकाऱ्यांना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर

नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधीतांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४०८१४१०२८२९६०२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Vitthalrao Veer

Digitally signed by Madhav Vitthalrao Veer
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madhav Vitthalrao Veer
Date: 2014.08.14 11:46:26 +05'30'

**(डॉ.माधव वीर)**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१) प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प व विकास)/ प्रधान सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक.
३) सर्व अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग.
४) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
५) खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा (कृ.खो.पा.वि.म.वगळून), मंत्रालय, मुंबई.
६) खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा (कृ.खो.पा.वि.म.),मंत्रालय, मुंबई.
७) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई.
८) संबंधीत अधिकारी.
९) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१०) सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) कार्यासने - दक्षता-१/दक्षता-२/दक्षता-३/गोपनीय शाखा/जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१२) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.